**अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेवर अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-१९२१/प्र.क्र.१२७/पापु-२३**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, सातवा मजला,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई
तारीखः २० मार्च, २०२३

वाचा -

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९**
२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दिनांक ३०.०६.२०२०**
३) **महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांक: मजीप्रा/शा.नि.२१.१२.२०१८/१०३/आ-३, दिनांक २७.११.२०२०**
४) **महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांक: मजीप्रा/२०१९/शा.नि.२१/१२/ २०१९/अ.पदे/आ-३/ दिनांक २७.०२.२०२३**

प्रस्तावना-

अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करू न शकलेल्या अथवा मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करून त्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याच्या सूचना सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या आहेत. त्यानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिपत्याखालील कार्यालयात ९८ कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संदर्भाधीन दिनांक २७.११.२०२० च्या पत्रान्वये शासनास सादर केला होता. त्याअनुषंगाने संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिनस्त कार्यालयांमधील कर्मचाऱ्यांसाठी ९८ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. शासन निर्णयातील सहपत्रातील यादीमध्ये अ.क्र.५७ येथे श्री. जे. आर. राहाटे यांचे नाव अंतर्भूत असून त्यांचे नाव वगळण्याचे

प्राधिकरणाने संदर्भाधीन क्र. ४ च्या पत्रान्वये प्रस्तावित केले आहे. त्याअनुषंगाने श्री. राहाटे यांचे नाव अधिसंख्य पदांच्या यादीतून वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

श्री. जे. आर. राहाटे यांची नियुक्ती अपंग प्रवर्गातून झाली असल्याने प्राधिकरणाने संदर्भाधीन ४ च्या पत्रान्वये निदर्शनास आणले आहे. त्यामुळे संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२० च्या शासन निर्णयाच्या सहपत्रातील यादीमध्ये अ.क्र.५७ येथे असलेले श्री. जे. आर. राहाटे यांचे नाव यादीतून वगळण्यात येत आहे. श्री. जे. आर. राहाटे यांची नियुक्ती अ.ज. प्रवर्गातून झाली नसल्याच्या अधीनतेने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून अधिसंख्य पदावरून वर्ग करण्याचे आदेश रद्द करण्यापूर्वी त्याबाबत खातरजमा करण्याची करण्याची जबाबदारी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२०१३३६५८३६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D90328C2FC4E73B881BCFEA3BC5824FA462A2EC1E4EAD4BFE3B4979112BDB493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2023.03.20 14:36:06 +05'30'

**(रा.म. गेंगजे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
२. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
३. मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
४. आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
५. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
६. महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
७. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
८. सर्व अध्यक्ष/सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई / नागपूर.

प्रत:-

१. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (साप्रवि/साविस) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. कार्यासन १६ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. कार्यासन (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती, पापु-२३